आरक्षित पदांवर मागासवर्गीय कर्मचाऱ्यांची भरती करण्याबाबत मागासवर्गीय संघटनांना रिक्त पदांची माहिती पुरविण्याबाबत.

---

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक:-बीसीसी-२०००/३१०/प्र.क्र.२४/२०००/१६-ब,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ७ मार्च,२०००.

वाचा:- १) शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक-बीसीसी-१०८३/(सीआर-१८३/८३)/१६-ब, दिनांक २८ सप्टेंबर,१९८३.
२) शासन परिपत्रक क्रमांक-बीसीसी-११८९/११२(प्र.क्र.७४/८९)/१६-ब, दिनांक -१० मे,१९८९.

## परिपत्रक

शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग,क्रमांक-बीसीसी-१०८३/(सीआर-१८३/८३)/१६-ब,दिनांक २८ सप्टेंबर,१९८३ व शासन परिपत्रक क्रमांक-बीसीसी-११८९/११२(प्र.क्र.७४/८९)/१६-ब, दिनांक १० मे,१९८९ अन्वये ज्या ५ संघटनांना त्यांच्या कडे नोंदणी केलेल्या मागासवर्गीय उमेदवारांना रिक्त पदांबाबतची फक्त माहिती पुरविण्यास मान्यता दिली आहे. या संघटनांव्यतिरिक्त आता ऑल इंडिया मुस्लिम ओ.बी.सी. ऑर्गनायझेशन या संघटनेस गट-क आणि गट-ड मधील जी पदे महाराष्ट्र लोकसेवा आयोग व विभागीय निवड मंडळे यांच्या कार्यकक्षेत येत नाहीत, अशा पदांवर मागासवर्गीय उमेदवारांची तात्पुरत्या स्वरूपात भरती करण्याबाबतच्या जाहिरातीतील रिक्त पदांची फक्त माहिती पुरविण्यासाठी शासन मान्यता देण्यात येत आहे.

या संघटनेकडे नोंदणी केलेल्या मागासवर्गीय उमेदवारांना रिक्त पदांबाबतची फक्त माहिती पुरविण्याच्या दृष्टीने, नियुक्ती अधिकाऱ्यांनी त्यांच्या कार्यालयात भरावयाच्या रिक्त पदांबाबतची माहिती वरील संघटनेस पाठवावी. मात्र या संघटनेकडे नोंदविलेल्या उमेदवारांच्या नावांची शिफारस सेवायोजन कार्यालये,समाजकल्याण अधिकारी किंवा आदिवासी विकास प्रकल्प अधिकारी यांच्यामार्फत होणे आवश्यक आहे. या संघटनेस नियुक्ती अधिकाऱ्यांकडे स्वतंत्रपणे उमेदवार पुरस्कृत करण्याचे अधिकार राहणार नाहीत.

सदर संघटनेस महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक ) नियम,१९७९ मधील नियम ७,२९,व ३० मध्ये विहित करण्यात आलेल्या तरतुदीनुसार मान्यता देण्यात आलेली नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

शैला तारगे पाटील
उप सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव/अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
* प्रबंधक,उच्च न्यायालय,मूळ शाखा,मुंबई,
* प्रबंधक,उच्च न्यायालय,अपील शाखा,मुंबई,
* प्रबंधक,लोकायुक्त आणि उपलोकायुक्त यांचे कार्यालय,मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई,
सचिव,सर्व प्रादेशिक निवड मंडळे,
सचिव,राज्य निवड मंडळ,
संचालक,समाजकल्याण,पुणे,
आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक,
संचालक,आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे,
संचालक,सेवायोजन,मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सर्व मंत्रालयीन विभाग,
निवड नस्ती.

---------

* पत्राने.

मच-137 I (4000-3-2000)-अ